**श्री. विनोद नारायण काळे, तांत्रिक अधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर यांच्याकडे अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर या रिक्त पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांक : अतिका-३१२५/प्र.क्र.११९/ना.पु.१५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक २० मे, २०२५.

**संदर्भ:-** १) महाराष्ट्र नागरी सेवा वेतन (नियम), १९८१ मधील नियम, ५६.
२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि., क्र.एस आरव्ही-२०१८/प्र.क्र.२०८/कार्या.१२, दि.०५.०९.२०१८.
३) शासन अधिसूचना, अ.ना.पु. व ग्रा.सं.वि., क्र. सेपनि-१२२०/प्र.क्र.१४०/ना.पु.१५, दि.२७.०३.२०२३.
४) शासन आदेश, अ.ना.पु. व ग्रा.सं.वि., क्र. अतिका-३१२५/प्र.क्र.८५/ना.पु.१५, दि.१२.०३.२०२५.

**शासन आदेश:-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक दि.०५.०९.२०१८ अन्वये अतिरिक्त कार्यभार सोपविण्यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना व तरतूदी विचारात घेऊन प्रशासकीय कारणास्तव पुरवठा यंत्रणेतील **श्री. विनोद नारायण काळे, तांत्रिक अधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर** यांच्याकडे **अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर** या रिक्त पदाचा **अतिरिक्त कार्यभार** पुढील शासन आदेश होईपर्यंत सोपविण्यात येत आहे.

२. श्री. विनोद नारायण काळे यांनी त्यांच्या मुळ पदाच्या कर्तव्य व जबाबदारीसह अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर या पदाची कर्तव्ये व जबाबदारी पार पाडण्याची खबरदारी घ्यावी.

३. श्री. विनोद नारायण काळे, विभागीय तांत्रिक अधिकारी, नागपूर यांनी अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर या पदाचा अतिरिक्त कार्यभार तात्काळ धारण करावा.

४. संदर्भ क्र.४ येथील दि.१२.०३.२०२५ रोजीच्या शासन आदेशान्वये अन्नधान्य वितरण अधिकारी, नागपूर या रिक्त पदाचा श्री.पंकज खुशालराव जळेकर,सहायक विभागीय पुरवठा अधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर यांच्याकडे सोपविण्यात आलेला अतिरिक्त कार्यभार या आदेशान्वये संपुष्टात आणण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२०११४३२१७७०६ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAMCHANDRA KONDIBA DHANAWADE
Date: 2025.05.20 11:44:13 +05'30'

**(रामचंद्र धनावडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

उप आयुक्त(पुरवठा), नागपूर विभाग, नागपूर यांच्यामार्फत-
१. श्री.पंकज खुशालराव जळेकर,सहायक विभागीय पुरवठा अधिकारी,विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर.
२. श्री.विनोद नारायणराव काळे, तांत्रिक अधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर.

**प्रत :-**

१) मा. उप मुख्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
४) जिल्हाधिकारी, नागपूर.
५) उप आयुक्त (पुरवठा), नागपूर विभाग, नागपूर
६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
७) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि., मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती (ना.पु.१५.)